न्यायिक अधिका-यांची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देणेबाबत - दिनांक ०१ मार्च, २०२२ ते ३१ ऑगस्ट, २०२२ या कालावधीसाठी ..

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डिईसी २०२२/प्र.क्र.३४/का.१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०४ मार्च, २०२२

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः एचसीटी १००२/१२८९/(१६२)/नऊ / चार, दिनांक ०८.०९.२००३
२ शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२
३ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः डिईसी २०२१/प्र.क्र.३६/का.१२, दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१
४ महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक A१२३७/६८(x)/२३२/२०२२, दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२२

**शासन निर्णय -**

संदर्भाधीन दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये जिल्हा व सत्र न्यायालयांच्या आस्थापनेवरील न्यायिक अधिका-यांच्या १२२५ अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संबंधित न्यायालयांचे कामकाज सुरळीत सुरु राहण्यासाठी खाली दर्शविलेल्या तक्त्यात नमूद केल्यानुसार न्यायिक अधिका-यांच्या १२३० अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२२ ते ३१ ऑगस्ट, २०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा न्यायालयाचे नाव | दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०३.२०२१ ते २८.०२.२०२२ या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२२ पासून ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | राज्यातील सर्व जिल्हा न्यायालये | न्यायिक अधिकारी १२२५ | ०२ | सीआरसी २०१७/ प्र.क्र.३१६/का.१२, दिनांक ०९.०२.२०२२ | १२३० |

| अ.क्र. | जिल्हा न्यायालयाचे नाव | दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०३.२०२१ ते २८.०२.२०२२ या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२२ पासून ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| | | | ०२ | पदनि२०१८/१०९९/ प्र.क्र.१८६/का.११, दिनांक०५.०२.२०२१ | |
| | | | ०१ | सीआरसी २११७/ प्र.क्र.१८०/का.१२, दिनांक ०९.०२.२०२२ | |

२. विधि व न्याय विभाग कार्यासन ९ यांचेकडून मुदतवाढ मिळणारी न्यायिक अधिका-यांची पदे या शासन निर्णयातून वगळली आहेत. तसेच, सदस्य मोटार अपघात दावा प्राधिकरण या २ पदांचा समावेश उपरोक्त मुदतवाढ देण्यात येत असलेल्या १२२५ पदांमध्ये आहे.

३. यासाठी येणारा खर्च "२०१४-न्यायदान" या मुख्य लेखाशीर्षाखाली “१०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश", “१०५-(तीन) दिवाणी न्यायाधिश" व "१०८ फौजदारी न्यायालये" यांपैकी योग्य त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखालील संबंधित वित्तिय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ नुसार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र.२७(२) (क) अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१४५१२७१२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.03.04 14:53:00 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,

२. प्रबंधक (निरीक्षणे-१), मा.उच्च न्यायालय मुंबई,

३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर, औरंगाबाद

४. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-एक/दोन, महाराष्ट्र मुंबई / नागपूर,

५. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा न्यायालय ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया, लघुवाद न्यायालय मुंबई, नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई, मुख्य महानगर दंडाधिकारी मुंबई

६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया,

७. उप जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदीया,

८. सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर, औरंगाबाद,

९. वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-५, अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई

१०. गृह विभाग, परिवहन-५, मंत्रालय, मुंबई

११. विधि व न्याय विभाग, कार्यासन २३ व २४,

१२. निवडनस्ती (का.१२)